सातारा जिल्ह्यातील जावळी तालुक्यातील योजनाबाह्य रस्ता ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२३/प्र.क्र.७९/नियोजन-२**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक-२६ एप्रिल, २०२३

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र जा.क्र.का-२/रेशा/२८/२००१/सन २०२३, दि.२७/०३/२०२३

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांनी संदर्भाधिन पत्रान्वये सातारा जिल्ह्यातील जावळी तालुक्यातील योजनाबाह्य रस्ता ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, सातारा यांनी सदर रस्ता ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना सन २००१-२१ मध्ये समाविष्ट करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यांचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, सातारा यांचा ठराव विचारात घेता, सदर रस्ता ग्रामीण मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, सातारा यांचा ठराव विचारात घेऊन सातारा जिल्ह्यातील जावळी तालुक्यातील खालील रस्ता ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना सन २००१-२१ मध्ये समाविष्ट करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | साखळी क्रमांक | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|
| | **तालुका - जावळी** | | | |
| १. | मौजे भूतेघर येथील रेशीमकेंद्र ते विठ्ठल रुक्मिणी मंदिर, भुतेघरमुरा ते भूतेश्वर मंदिर रस्ता. | ०/०० ते ३/०० | ३.०० कि.मी. | ग्रामीण मार्ग क्र. ३४७ |
| | **एकूण** | | **३.०० कि.मी.** | |

परिणामी रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील सातारा जिल्ह्यातील ग्रामीण मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत **३.०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (६८२४.३३० + ३.००) म्हणजेच **६८२७.३३० कि. मी.** इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०४२७११४६५३५११८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANPAT SANDIPAN KACHARE

Digitally signed by GANPAT SANDIPAN KACHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3021bf955fefd71ffad5dd7c97769147f19aca6383a12fed6cff4849d78e224a, pseudonym=44879507A55BADCE1C62B2D52FC25354CE085DFF, serialNumber=B5B30AEBA818C77E43E7B8BA4BCA0E9F0D137FEAB0BBCB16CACF2D44087E8A76, cn=GANPAT SANDIPAN KACHARE
Date: 2023.04.27 11:52:48 +05'30'

**(ग.सं. कचरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, पुणे.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
३) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, सातारा. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

**प्रत :-**

१) उप सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई.
२) जिल्हाधिकारी, सातारा.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा.
४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सातारा.
५) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
६) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
७) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.
८) निवडनस्ती.